**श्री. अभय रावसाहेब शिंदे, सहाय्यक नगर रचनाकार, सहाय्यक संचालक, नगर रचना, मूल्यांकन, पुणे यांचा राजीनामा मंजूर करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्र.राजीना-५९१५/१६३७/प्र.क्र.३०५/नवि-२७,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक :- ०९ नोव्हेंबर, २०१५.

वाचा :- १. श्री. अभय रावसाहेब शिंदे, सहाय्यक नगर रचनाकार, सहाय्यक संचालक, नगर रचना, मूल्यांकन, पुणे यांचा अर्ज, दि.०६.१०.२०१५.

२. सहाय्यक संचालक, नगर रचना, मूल्यांकन, पुणे यांचे पत्र दि.०८.१०.२०१५.

३. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा प्रस्ताव क्र.आस्था/अराशिं/सनर/प्रशा-१/६६८४, दि.२६.१०.२०१५.

४. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-१०९२/१०३३/प्र.क्र.३३/९२/८, दि.०२.१२.१९९७.

**प्रस्तावना :-**

नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील श्री. अभय रावसाहेब शिंदे, सहाय्यक नगर रचनाकार, सहाय्यक संचालक, नगर रचना, मूल्यांकन, पुणे यांनी त्यांच्या **संदर्भ-१** येथील दि.०६.१०.२०१५ रोजीच्या अर्जान्वये वैयक्तिक कारणास्तव त्यांच्या पदाचा राजीनामा स्वीकृत करण्याची विनंती केलेली आहे. सहाय्यक संचालक, नगर रचना, मूल्यांकन, पुणे यांनी त्यांच्या **संदर्भ-२** येथील दि.०८.१०.२०१५ च्या पत्रान्वये श्री. अ. रा. शिंदे, सहाय्यक नगर रचनाकार यांचा अर्ज पुढील आवश्यक त्या कार्यवाहीस्तव संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या कार्यालयास सादर केलेला आहे.

**०२.** सहाय्यक नगर रचनाकार (श्रेणी-१) पदाचे नियुक्ती प्राधिकारी शासन असल्याने संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी त्यांच्या **संदर्भ-३** येथील दि.२६.१०.२०१५ च्या पत्रान्वये श्री. अ. रा. शिंदे, सहाय्यक नगर रचनाकार यांचा राजीनामा स्वीकारण्याबाबतचा प्रस्ताव शासन मान्यतेस्तव सादर केलेला आहे.

**०३.** श्री. अ. रा. शिंदे, सहाय्यक नगर रचनाकार हे सामान्य प्रशासन विभागाच्या **संदर्भ-४** येथील दि.०२.१२.१९९७ मधील परिच्छेद क्र.११ मधील (अ) ते (ड) येथील विहित अटींची पूर्तता करीत असून अट क्र. (ड) नुसार त्यांनी राजीनामा मंजूरीकरिता एक महिन्याच्या पूर्वसूचनेऐवजी एक महिन्याच्या मूळ वेतनाची रक्कम दि.०७.११.२०१५ रोजी चलनाव्दारे शासकीय कोषागारात भरणा केलेली आहे.

**०४.** सबब, श्री. अ. रा. शिंदे, सहाय्यक नगर रचनाकार यांचा राजीनामा मंजूर करुन त्यांना शासन सेवेतून कार्यमुक्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन निर्णय :-**

श्री. अभय रावसाहेब शिंदे, सहाय्यक नगर रचनाकार, सहाय्यक संचालक, नगर रचना, मूल्यांकन, पुणे यांचा सहाय्यक नगर रचनाकार पदाचा राजीनामा दि.३१ ऑक्टोबर, २०१५ (म.नं.) पासून स्वीकारण्यात (मंजूर) येत असून त्यांना "सहाय्यक नगर रचनाकार" पदावरुन शासन सेवेतून कार्यमुक्त करण्यात येत आहे.

**०२.** श्री. अ. रा. शिंदे, सहाय्यक नगर रचनाकार यांचा राजीनामा देण्याचा हेतू स्पष्ट झाल्याची खातरजमा करण्यात आली आहे.

**०३.** श्री. अ. रा. शिंदे, सहाय्यक नगर रचनाकार यांच्या राजीनाम्यापूर्वी त्यांच्याविरुद्ध कोणतीही विभागीय चौकशी प्रलंबित / प्रस्तावित नाही.

**०४.** श्री. अ. रा. शिंदे, सहाय्यक नगर रचनाकार यांच्याकडून शासनास कोणत्याही प्रकारचे येणे नाही.

**०५.** सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एआरव्ही-१०९२/१०३३/प्र.क्र.३३/९२/८, दि.०२.१२.१९९७ मधील परिच्छेद २ (इ) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या शक्तीनुसार सदरचे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

**०६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेताक २०१५११०९१६५१३२६७२५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Dilip Sitaram Anerao

Digitally signed by Dilip Sitaram Anerao
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=26293749901b04ac59c3d853c2fdc32df6083d811902b3e94b40b924fa028887, cn=Dilip Sitaram Anerao
Date: 2015.11.09 17:23:20 +05'30'

**( दि. सि. अणेराव )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई.
२. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
३. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
४. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे. (३-प्रती)
५. विभागीय सह संचालक, नगर रचना, पुणे विभाग, पुणे.
६. सहाय्यक संचालक, नगर रचना, मूल्यांकन, पुणे.
७. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
८. श्री. अभय रावसाहेब शिंदे, सहाय्यक नगर रचनाकार, सहाय्यक संचालक, नगर रचना, मूल्यांकन, पुणे, यांना **(संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेमार्फत)**
९. निवडनस्ती (नवि-३).

*****